D:\23 HARSHA\2003\BUD 1\LEKHANUDAN\

प्रति,

उप सचिव (सेकपी-१),
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

क्रमांक : बीजीटी-१००३/२२५०/२००३-२००४/बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
दिनांक : ४ एप्रिल, २००३

विषय :- लेखानुदान सन २००३-२००४, मागणी क्र. बी-६
मुख्यलेखाशीर्ष :" २२५०-इतर सामाजिक सेवा "

सन २००३-२००४ च्या अर्थसंकल्पास विधीमंडळाची पूर्णत: मान्यता मिळेपर्यंतचा खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २००३ मंजूर केले आहे. सदर विधेयकाचे अधिनियमात रुपांतर झाले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ९ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दि.२९ मार्च २००३" मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

मुख्यलेखाशीर्ष " २२५०-इतर सामाजिक सेवा " या खालील आपल्या संबंधित एकूण तरतूदीच्या १/६ अनुदान म्हणजेच रु. १६,६६,०००/- (दरसमत) एवढी रक्कम खर्च करण्यासाठी विधीमंडळाने मान्यता दिलेली आहे. आपल्या माहितीकरिता वरील लेखाशीर्षाखालील सन २००३-२००४ साठी एकूण अर्थसंकल्पिय तरतूद सोबतच्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक-३ मध्ये दर्शविली आहे. एकूण तरतूदीच्या १/६ पेक्षा जास्त खर्च होणार नाही याची कृपया नोंद घ्यावी तसेच यातून फक्त स्थायी खर्च भागविण्यात यावा.

( शि. शं. धुमाळे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत रवाना,

महालेखापाल -१ ( लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल -२ ( लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१०), मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, गृह विभाग (सेकपी-१).
कक्ष अधिकारी, गृह विभाग, (बीयुडी-२).

# विवरणपत्र

शासन पत्र, गृह विभाग, क्रमांक:बीजीटी १००३/२२५०/२००३-२००४/बीयुडी-१,
दिनांक:- ४ एप्रिल, २००३ या सोबतचे विवरणपत्र.

" २२५०-इतर सामाजिक सेवा " **मागणी क्रमांक: बी-६**

(रुपये हजारात)

| नियंत्रण अधिकारी | तपशिलवार लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद सन २००३-२००४ |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| उप सचिव (सेकपी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. | १०१, धर्मादाय प्रयोजनासाठी देणग्या<br>(००)(०२) अंकिचन व्यक्तींच्या दफनाचा खर्च व अंत्यसंस्काराचा खर्च<br>(२२५० ०२१९)<br>... २० इतर खर्च<br>(००)(०३)धर्मादाय प्रयोजनासाठी देणग्या<br>... संस्थांना देणग्या<br>(२२५० ०२२८) | --<br><br><br><br><br><br>१०००० |
| एकुण " २२५०-इतर सामाजिक सेवा " | | १०००० |

*************